**<u>लिपिक-टंकलेखक (मराठी/ इंग्रजी) परीक्षा-२०१७</u>**
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या उमेदवारांचे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मंबईतील राज्य शासनाच्या विविध कार्यालयातील लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः एएससी १५१८/प्र.क्र.९३/१४-अ,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०८ फेब्रुवारी, २०१९

<u>वाचा</u> :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. मलोआ २०१७/प्र.क्र.१२६/१४-अ, दिनांक २१-०८-२०१७
२) शासन ज्ञापन क्रमांक एएससी १५१८/प्र.क्र.९३/१४-अ, दिनांक ४ जुलै, २०१८

<u>ज्ञापन :-</u>

लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) या पदावर नियुक्ती करण्यासाठी घेण्यात आलेल्या लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) परीक्षा-२०१७ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने क्रमांक: १४४२/१६२/२०१७/तेरा-ब, दिनांक १८.५.२०१८ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या व निवडसूचीत समावेश करण्यात आलेल्या उमेदवारांचे संदर्भाधिन क्र. २ च्या आदेशान्वये मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबई राज्य शासनाच्या विविध कार्यालयात लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियतवाटप करण्यात आले होते. तथापि रुजू न झालेल्या उमेदवारांच्याऐवजी आयोगाकडे दिनांक २७/११/२०१८ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने क्रमांक: १४४२/१६२/२०१७/तेरा-ब, दिनांक २३ जानेवारी, २०१९ च्या पत्रान्वये शासनाने कळविल्यानुसार रूजू न झालेल्या प्रवर्गातील आरक्षित जागांसाठी प्रतिक्षायादीतील उमेदवार उपलब्ध करुन दिले आहेत. संदर्भाधिन क्र. १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार सोबतच्या **विवरणपत्र "अ" "ब"** मधील उमेदवारांचे त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभाग/बृहन्मुंबईतील राज्य शासनाच्या विविध कार्यालयात लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियतवाटप करण्यात येत आहे. तथापी, माजी सैनिक खुला प्रवर्गामध्ये उपलब्ध करुन दिलेल्या उमेदवारांपैकी श्री. झांजुर्णे सुहास चंद्रकांत (गुणवत्ता क्रमांक ५९३१), श्री. चिर्के संदीप बाबासाहेब (गुणवत्ता क्रमांक ५९२८) व श्री.पाटील संतोष दादू (गुणवत्ता क्रमांक ५९६०) या उमेदवारांनी लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती स्वीकारणार नसल्याचे शपथपत्राद्वारे कळविले आहे. यास्तव सदर ३ उमेदवारांचे नियतवाटप करण्यात आलेले नाही.

२. सोबतच्या विवरणपत्र "अ" "ब" मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची नेमणूक पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात यावी :-

| | |
|---|---|
| (१) | सदर विवरणपत्रातील सर्व उमेदवारांनी **दिनांक ११ मार्च, २०१९ पर्यंत** संबंधित विभाग/कार्यालयात व्यक्तिश: उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. सदरहू कालावधीत उमेदवारांनी अस्थायी नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता, या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल. तसेच, विहित कालावधीत नियुक्ती स्वीकारणाऱ्या उमेदवारांची ज्येष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (सेवाज्येष्ठतेचे विनियमन) नियम, १९८२ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक २३ जानेवारी, २०१९ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहील. तसेच शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही -२०१८/व्ही.आय.पी./प्र.क्र.२०७/कार्या-१२,दिनांक २८/५/२०१८ मधील तरतूदीनुसार, "सदर उमेदवारांची शिफारस ही प्रतिक्षायादीमधून झालेली असल्यामुळे, सदर उमेदवारांची ज्या आदेशान्वये नियुक्ती होईल, त्या आदेशानुसार ते ज्या दिनांकास रुजू होतील त्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निर्धारित केली जाईल. सदर उमेदवारांना मूळ गुणवत्ता यादीनुसार ज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत" |
| (२) | लोकसेवा आयोगाकडे केलेल्या अर्जातील दाव्याची तपासणी/पडताळणी आयोगाने केलेली नसल्याने, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या लिपिक-टंकलेखक (मराठी/ इंग्रजी) परीक्षा- २०१७ साठी देण्यात आलेल्या जाहिरात क्रमांक ५६/२०१७, दिनांक २७.०७.२०१७ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची दिनांक ०१.०८.२०१७ रोजीच्या अर्हतेनुसार तसेच शैक्षणिक आणि अन्य अटींची दिनांक १०.०८.२०१७ रोजीच्या अर्हतेनुसार खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारांनी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे अत्यावश्यक आहे :-<br>१) वयोमर्यादा :- दिनांक ०१/०८/२०१७ रोजीची<br>(अ) अमागास : किमान १८ वर्षे असावे व ३८ वर्षापेक्षा जास्त नसावे.<br>Age reference date (02.08.1979 to 01.08.1999)<br>(आ) अमागास खेळाडू : किमान १८ वर्षे असावे व ४३ वर्षापेक्षा जास्त नसावे.<br>Age reference date (02.08.1974 to 01.08.1999)<br>(इ) मागासवर्गीय : किमान १८ वर्षे असावे व ४३ वर्षापेक्षा जास्त नसावे.<br>Age reference date (02.08.1974 to 01.08.1999)<br>(ई) मागासवर्गीय खेळाडू : किमान १८ वर्षे असावे व ४३ वर्षापेक्षा जास्त नसावे.<br>Age reference date (02.08.1974 to 01.08.1999)<br>(उ) अमागास माजी सैनिक : कमाल वयोमर्यादा ३८ वर्षे + सेवेचा कालावधी + ३ वर्षे<br>(ऊ) मागासवर्गीय माजी सैनिक: कमाल वयोमर्यादा ४३ + सेवेचा कालावधी + ३ वर्षे<br>(ऋ) विकलांग : कमाल वयोमर्यादा ४५ वर्षापर्यंत शिथिलक्षम<br>Age reference date (02.08.1972 to 01.08.1999)<br>२) अधिवास : मुख्य परीक्षेच्या जाहिरात क्रमांक ५६/२०१७ मध्ये नमूद केल्यानुसार<br>३) शैक्षणिक पात्रता : माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (S.S.C.) उत्तीर्ण अथवा तत्सम अर्हता मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास किंवा तत्पूर्वी म्हणजेच दिनांक १०.०८.२०१७ रोजी किंवा तत्पूर्वी धारण करणे आवश्यक.<br>४) उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे (NCL) प्रमाणपत्र - प्रस्तुत परिक्षेची जाहिरात दिनांक ६ एप्रिल, २०१७ रोजी विज्ञापित केलेली आहे. त्यामुळे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे (NCL) प्रमाणपत्र जाहिरात विज्ञापित झालेल्या |

| | |
|---|---|
| | वित्तीय वर्षापूर्वीच्या (एप्रिल ते मार्च) वित्तीय वर्षातील म्हणजेच दिनांक **०१.०४.२०१६ ते ३१.०३.२०१७ या वित्तीय वर्षापासून असावे.**<br><br>५) नियतवाटप करण्यात आलेल्या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे दावे आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून तसेच अन्य सर्व मागासवर्गीय उमेदवारांचे जाती / जमातीचे दावे नियुक्तीपूर्वी संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांचेकडून तपासून घेण्यात यावेत.<br><br>६) विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड), इतर मागासवर्ग तसेच अमागास (महिला) या वर्गवारीवर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रमाणित केलेली उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे विहित नमुन्यातील (NCL) प्रमाणपत्र नियुक्तीपूर्वी संबंधित प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेऊन त्यांच्या नियुक्तीबाबत निर्णय घेण्यात यावा.<br><br>७) मागासवर्गीय असल्यास जाती/जमातीबद्दल विहित नमुन्यात आणि विहित अधिकाऱ्याने दिलेले मूळ प्रमाणपत्र. तसेच संबंधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती यांनी दिलेले जात वैधता प्रमाणपत्र. अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांसाठी उन्नत व प्रगत गटात (क्रिमीलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तद्नंतरचे** प्रमाणपत्र.<br><br>८) खेळाडू/शारीरिक अपंग असल्यास, त्याबाबतचे सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेले मूळ प्रमाणपत्र.<br><br>९) लिपिक-टंकलेखक (मराठी) पदासाठी मराठी टंकलेखनाचे ३० शब्द प्रति मिनिट गतीचे व लिपिक-टंकलेखक( इंग्रजी) पदासाठी इंग्रजी टंकलेखनाचे ४० शब्द प्रति मिनिट गतीचे शासकीय परीक्षा मंडळाचे दिनांक १०.०८.२०१७ रोजीचे किंवा तत्पुर्वीचे प्रमाणपत्र.<br><br>शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : एसपीई १०१२/(१०८/१२)/साशि-१, दिनांक ३१.१०.२०१३ नुसार अथवा तद्नंतर शासनाने वेळोवेळी आदेश काढून विहित केलेली संगणक टंकलेखक अर्हता-बेसिक कोर्स इन कॉम्प्युटर टायपिंग मराठी ३० शब्द प्रति मिनिट अथवा बेसिक कोर्स इन कॉम्प्युटर टायपिंग इंग्रजी ४० शब्द प्रति मिनिट समकक्ष अर्हता म्हणून स्वीकारार्ह आहे. सदर अर्हता मुख्य परिक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास किंवा तत्पुर्वी (दिनांक १० ऑगस्ट, २०१७ किंवा तत्पूर्वी) धारण करणे आवश्यक आहे. |
| (३) | उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, शारीरिक अपंग, जाती विषयक प्रमाणपत्र, इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक अपंग असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, इत्यादीबाबतची मूळ प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती |

| | |
|---|---|
| | प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल व तसे आयोगाला कळविण्यात येईल. |
| (४) | महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांकडून महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ८२/२००१/मसेआ-२०००/ प्र.क्र.४१५/का.२, दिनांक २५.५.२००१ नुसार शासनाने प्रस्तावित केलेले उन्नत व प्रगत गटात (क्रिमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तद्नंतरचे** प्रमाणपत्र संचालक, महिला व बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचेकडून तपासून घेण्यात येईल व त्यामधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल. |
| (५) | माजी सैनिक उमेदवारांच्या बाबतीत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एएससी १५१२/प्र.क्र.१४८/१४-अ, दिनांक २४.०३.२०१७ नुसार शासकीय वाणिज्य संस्थेचे विहित वेगाच्या टंकलेखनाचे प्रमाणपत्र शासन सेवेतील नियुक्तीच्या दिनांकापासून ११ महिन्यांच्या आत शासनाला सादर करण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात यावी. तसेच सा.प्र.वि.शासन परिपत्रक क्र.आयपीई /आरटीए/ १०८०/ १८१/XVI दि.१०.१०.१९८० व शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही १०९७/ प्र.क्र.३१/ ९८/१६-अ दि.१६.३.१९९९ मधील तरतूदीनुसार माजी सैनिक आरक्षणांतर्गत पर्याप्त संख्येत उमेदवार उपलब्ध न झालेल्या उमेदवारांऐवजी, त्या त्या प्रवर्गातील ज्या उमेदवारांची शिफारस आयोगाने माजी सैनिक आरक्षणांतर्गत केली आहे, अशा Against Ex-Ser अशी शिफारस केलेल्या उमेदवारांकडून माजी सैनिक असल्याबाबतचे प्रमाणपत्र मागविण्यात येऊ नये. माजी सैनिकांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस झालेल्या उमेदवारांबाबत, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: आरटीए-१०९०/प्र.क्र.२२२/९१/ २८, दिनांक ३०.१२.१९९१ मधील तरतूदींची पूर्तता होत असेल तरच त्यांना नियुक्ती देण्यात यावी. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: आरटीए-१०८२-३५०२-सीआर-१००-१६-अ, दिनांक २.९.१९८३ नुसार माजी सैनिक वर्गवारीचा दावा केलल्या उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या माजी सैनिक वर्गवारीच्या दाव्याच्या तपासणीच्या अधीन राहून करावी. |
| (६) | माजी सैनिकांचा दावा केलेल्या उमेदवारांचे वय आणि माजी सैनिक म्हणूनची सेवा वैध/पुरेशी आहे काय व माजी सैनिक प्रवर्गाच्या आरक्षणास ते खरोखरच पात्र आहेत का याबाबत तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती देण्यापूर्वी नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी खात्री करावी. तसेच अर्जात माजी सैनिकांचा दावा केलेले परंतु प्रत्यक्षात वयाने कमी असलेले काही उमेदवार प्रस्तुत प्रकरणी शिफारसपात्र ठरले असल्याने संबंधित उमेदवारांचे वय व त्यांनी धारण केलेला अनुभव यात आढळून येत असलेल्या विसंगतीच्या अनुषंगाने माजी सैनिक पदावर शिफारसपात्र ठरलेल्या ज्या उमेदवारांचे वय विहित दिनांकास ३३ वर्षांपेक्षा कमी आहे, अशा खालील उमेदवारांच्या दाव्यांच्या विशेष तपासणीसह माजी सैनिक पदावरील शिफारसपात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांच्या माजी सैनिक असण्याबाबतच्या दाव्याची/सेवा कालावधीची त्यांच्या सेवा पुस्तकाआधारे, अन्य तद्नुषंगिक कागदपत्र तसेच संबंधित शासन निर्णयातील तरतुदींआधारे नियुक्तीपूर्वी सखोल व काटेकोरपणे तपासणी करुन तसेच दाव्यांची सत्यता पडताळूनच त्यांना शिफारस केलेल्या पदावर नियुक्ती देण्यात यावी :- |

| शिफारस क्रमांक | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव |
|---|---|---|
| १६५ | ६११८ | AMBRE KANCHAN VISHVANATH |
| १५३ | ५९६३ | PAWAR YUVRAJ TUKARAM |

| | |
|---|---|
| (७) | खेळाडूंसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची शिफारस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : |

<table>
<tr><td></td><td>राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ०१.०७.२०१६ आणि त्यास अनुसरुन प्रसिध्द करण्यात आलेल्या शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो-२००२/ प्र.क्र.६८/ क्रीयुसे-२, दिनांक १८.०८.२०१६ व तद्नंतर शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार गट-क पदासाठी निश्चित केलेले दिनांक २६.०४.२०१७ रोजीचे किंवा तत्पूर्वीचे क्रीडा प्रमाणपत्र व त्यासंदर्भातील संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालकांचा दिनांक १०.०८.२०१७ रोजीचा किंवा तत्पूर्वीचा क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर करण्याच्या अधिन करण्यात आलेली आहे. त्यानुसार गट-क पदाकरीता ग्राह्य असल्याबाबतच्या संबंधित विभागीय उपसंचालकांच्या वर उल्लेखित विहित दिनांकाच्या पडताळणी अहवालाच्या तपासणीनंतरच गुणवत्ताधारक खेळाडू पदावर शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात यावी.</td></tr>
<tr><td>(८)</td><td>समांतर आरक्षणासंदर्भातील कार्यवाहीनुसार अराखीव (गुणवत्ताधारक खेळाडू) वर्गवारीकरीता शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांच्या मूळ वर्गवारीची त्यांच्या अराखीव प्रवर्गातील समांतर आरक्षणासाठीच्या पदावरील पात्रतेबाबत योग्य तपासणी/छाननी नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून नियुक्तीपूर्वी तपासण्याच्या अटीच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेली आहे.</td></tr>
<tr><td>(९)</td><td>नियतवाटप यादीतील ज्या उमेदवारांनी अर्जात Domicile-No चा दावा केला आहे. तथापि प्रस्तुत उमेदवारांची अराखीव (माजी सैनिक) वर्गवारीवर सदर उमेदवारांचे अधिवास प्रमाणपत्र तपासण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे शिफारस करण्यात आली आहे. याबाबतची अधिवास प्रमाणपत्राची तपासणी नियतवाटप करण्यात आलेल्या विभागानी / कार्यालयानी नियुक्तीपूर्वी करणे आवश्यक आहे.</td></tr>
<tr><td>(१०)</td><td>शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग दिनांक १३.०८.२०१४ तसेच अन्य अद्यावत शासन निर्णयामधील तरतूदीआधारे सदर शिफारशी करण्यात आल्या असल्याने, शासनाने यासंदर्भात वेळोवेळी केलेल्या सूचना विचारात घेता लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदाकरीता अमागास समांतर आरक्षित [अमागास (महिला), अमागास (खेळाडू), अमागास (माजी सैनिक)] पदावर शिफारसपात्र ठरलेले उमेदवार हे प्रत्यक्षात खुल्या (अराखीव) प्रवर्गातीलच उमेदवार आहेत याची त्यांच्या शाळा/महाविद्यालय सोडल्याच्या दाखल्याआधारे तसेच अन्य तद्नुषंगिक दस्तऐवजाआधारे नियुक्तीपूर्वी खात्री व पडताळणी करुनच त्यांना लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियुक्ती देण्यात यावी.</td></tr>
<tr><td>(११)</td><td>अपंगांसाठी राखीव पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभागाच्या खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी :-
<table>
<tr><td>(अ)</td><td>सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग १००३/प्र.क्र.१२७/२००३/१६-अ, दिनांक ०६.०५.२००४.</td></tr>
<tr><td>(ब)</td><td>सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ०३.०८.२०१०.</td></tr>
<tr><td>(क)</td><td>सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अपंग २००९/प्र.क्र.१३३/सुधार-३, दिनांक १४.०१.२०११.</td></tr>
<tr><td>(ड)</td><td>सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/ प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ०६.१०.२०१२.</td></tr>
</table>
शिफारसपात्र ठरलेल्या विकलांग उमेदवारांनी सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/ प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ०६.१०.२०१२ मधील आदेशानुसार SADM या</td></tr>
</table>

| | |
|---|---|
| | संगणक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील विकलांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य राहील. |
| (१२) | सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग २०१६/प्र.क्र.११६/१६-अ, दिनांक १६.११.२०१६ अन्वये शासन सेवेत अपंगांसाठी आरक्षित असलेल्या लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती होणाऱ्या उमेदवारांना लिपिक-टंकलेखक (इंग्रजी/मराठी) टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षाच्या कालावधीत व २ संधीत सदर परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी अवधी व संधी देण्यात आली आहे. यास्तव, अपंगांसाठी आरक्षित असलेल्या पदावर शिफारसपात्र उमेदवारांच्या बाबतीत त्यानुसार कार्यवाही करण्यात येईल. |
| (१३) | ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६.५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल. |
| (१४) | मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दिनांक १८.५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येईल. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे नियुक्ती प्राधिकाऱ्यास तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.<br>नियुक्ती प्राधिकाऱ्याने विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवावी. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे/पुरावे सादर करुन पाठपुरावा करावा. याप्रमाणे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मध्ये विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. या कालावधीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकल्यास सदर उमेवाराची पूर्वसूचना न देता सेवा समाप्त करण्याची कार्यवाही नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी. त्यासाठी नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या उमेदवारांचा वेळोवेळी आढावा घ्यावा व विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकणाऱ्या उमेदवाराच्या बाबतीत तातडीने सेवा समाप्तीची कार्यवाही करावी. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून ते संबंधित समितीकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही देखील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी. |
| (१५) | लिपिक-टंकलेखक पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील |

| | |
|---|---|
| | तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/ प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र क्र.मातंसं २०१२/प्र.क्र.२७०/३९, दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र/अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास उमेदवाराच्या सेवा समाप्त करण्यात येतील ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी. |
| (१६) | लिपिक-टंकलेखक (इंग्रजी) या पदावर नियुक्त होणाऱ्या उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना प्राप्त करावयाच्या मराठी लघुलेखन / मराठी टंकलेखन परिक्षा सक्तीची करण्याबाबत) नियमावली १९९१ मधील नियमानुसार मराठी टंकलेखनाची प्रति मिनिट ३० शब्द गतीची परीक्षा, शासन सेवेत प्रविष्ट झाल्याच्या दिनांकापासून ४ वर्षाच्या आत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील ही बाबही उमेदवारांच्या नियुक्ती आदेशात स्पष्ट करावी. तसेच, मराठी भाषा विभाग, शासन निर्णाय क्रमांक : टंलेप २०१५/प्र.क्र.१७६/भाषा-२, दिनांक २४.०३.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार त्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. |
| (१७) | हिंदी व मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर शिफारसप्राप्त उमेदवार अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाला नसेल किंवा त्याला सदरहू परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळली नसेल तर, सदरहू उमेदवारांना ती परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. |
| (१८) | उमेदवारांना साक्षांकन नमुने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत पाठविण्यात आले आहेत. सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने त्याचे नियतवाटप करण्यात आलेल्या विभागात हजर होताना तो सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : चापअ १००८/प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **“प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल.”** असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक : चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात. |
| (१९) | अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील** प्रमाणपत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.१५/मावक-५, दिनांक ३०.६.२००६ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार तपासण्यात यावे. तसेच, यासंदर्भात सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय |

| | |
|---|---|
| | क्रमांक : सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.६९७/विजाभज-१, दिनांक २४.६.२०१३ अन्वये विहित केलेली तरतूद विचारात घेण्यात यावी. |
| (२०) | मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्र.२०५३/२०१४ प्रकरणी होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या तसेच समांतर आरक्षणाच्या मुद्दयासंदर्भात तसेच अन्य मुद्दयासंदर्भात विविध मा.न्यायालय/मा.न्यायाधिकरणात दाखल करण्यात आलेल्या न्यायिक प्रकरणातील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सरळसेवा लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) मुख्य परीक्षा २०१७ मधून उमेदवारांची शिफारस केली आहे याची उमेदवारांनी नोंद घ्यावी. |
| (२१) | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रस्तुत परीक्षेच्या प्रतिक्षायादीच्या निकालाआधारे उमेदवारांच्या शिफारशी त्यांनी प्रस्तुत परीक्षेच्या अर्जात नमूद केलेल्या दाव्यांच्या अनुषंगाने त्यांची पात्रता नियुक्तीपूर्वी शासन स्तरावरुन मूळ प्रमाणपत्रावरुन तपासण्याच्या अटीच्या अधीन राहून शासनाकडे केल्या आहेत. सदर तपासणीत उमेदवारांनी आवेदपत्रात दिलेली माहिती खोटी अथवा चुकीची आढळून आल्यास अथवा आवेदनपत्रातील दाव्यानुसार आवश्यक प्रमाणपत्रांची पूर्तता न केल्यास शासन स्तरावर अधीसूचनेतील तरतुदीनुसार दावे तपासताना किंवा अन्य कारणामुळे अपात्र ठरणाऱ्या संबंधीत उमेदवारांची उमेदवारी / शिफारस कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल. |
| (२२) | सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : टीआरएन-२०१४/३४२/प्र.क्र.५०/१४/१२-अ, दिनांक २७.०५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४-ब, दिनांक १३.०५.२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत) प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे. |
| (२३) | लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) मुख्य परीक्षा २०१७ करीता शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांनी मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राच्या प्रतीदेखील यासोबत उपलब्ध करुन देण्यात येत असून, संबंधित उमेदवारांचा अर्जातील फोटो व प्रत्यक्षात रुजू झालेला उमेदवार तोच आहे का, तसेच त्यांनी परीक्षेच्यावेळी दिलेल्या ओळखपत्रावरुन अर्जातील उमेदवाराचा फोटो व स्वाक्षरी, ओळखपत्रावरील फोटो व स्वाक्षरी त्याच उमेदवाराची आहे का, सादर केलेले ओळखपत्र अधिकृत आहे का, याची नियुक्तीपूर्वी शासन स्तरावरुन सखोल तपासणी करण्यात यावी. तसेच उमेदवारांनी परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची वैधता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावी. तद्नंतरच लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावरील उमेदवारांच्या नियुक्त्या करण्यात याव्यात. |
| (२४) | लिपिक-टंकलेखकांची पदे ही मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मुंबईतील विविध शासकीय कार्यालयातील असल्याचे प्रस्तुत परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. त्यामुळे उमेदवारांची अन्य जिल्ह्यामध्ये नियुक्ती देण्याची विनंती मान्य केली जाणार नाही व या संदर्भातील अर्जाची दखल घेतली जाणार नाही. तसेच, अन्य विभाग/कार्यालयात पुनर्वाटप करण्याबाबतच्या विनंतीचाही विचार करण्यात येणार नाही. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही २०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०७/कार्या-१२, दिनांक २८ मे, २०१८ नुसार उमेदवारांनी सदर |

| | |
|---|---|
| | नियुक्ती विहीत मुदतीत स्विकारणे आवश्यक असून या संदर्भात उमेदवारांच्या मुदतवाढीच्या विनंती अर्जाची दखल घेतली जाणार नाही वा याबाबतच्या पत्रव्यवहाराची पोचही या विभागाकडून दिली जाणार नाही. |
| (२५) | मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वत:च करावयाची असून त्यासाठी मुदतवाढ दिली जाणार नाही. |
| (२६) | अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वत:च सोसावयाचा आहे. |
| (२७) | उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा. |
| (२८) | नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे. |

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९०२०८१६५८४११००७ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.02.08 17:11:06 +05'30'

( ग.भि.गुरव )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

उमेदवारासाठी सहपत्रे : १) रुजू अहवाल
२) नियतवाटप केलेल्या कार्यालयांच्या पत्त्यांची यादी

कार्यालयांसाठी सहपत्रे : १) उमेदवारांच्या नावाची यादी (उमेदवारांचा भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह)
२) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत
३) लिपिक-टंकलेखक परीक्षा-२०१७ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत ( अधिसूचना )
४) प्रतिवेदन नमूना (उमेदवार दिनांक ११.०३.२०१९ पर्यंत विभाग/कार्यालयात नियुक्तीसाठी हजर न झाल्यास त्या उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय व ओळखपत्राच्या प्रतीसह कोणत्याही परिस्थितीत दिनांक २५.०३.२०१९ पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा.)
५) लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) मुख्य परीक्षा २०१७ करीता शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांनी मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची प्रती.

प्रत :-

१) अवर सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
२) नियुक्ती प्राधिकारी, संबंधित बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालय, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
४) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे).
५) संग्रहार्थ (साप्रवि/१४-अ).

**महाराष्ट्र लोकसेवा आयोग लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) मुख्य परीक्षा २०१७ प्रतिक्षायादीतील उमेदवारांचे नियतवाटप - मंत्रालय व बृहन्मुंबई - मराठी**

**शासन ज्ञापन क्रमांक एएससी-1518/प्र.क्र.93/14-अ, दिनांक 08-02-2019 सोबतचे विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | शिफारस क्रमांक | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | ज्या प्रवर्गात शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप केलेला विभाग / कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| 1 | 1 | 121 | TUSHAR SOMNATH PATHADE | Open | MAR - OPEN -General -WT-1 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 2 | 2 | 122 | SHELKE SWAPNIL SUDHAKAR | Open | MAR - OPEN -General -WT-2 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 3 | 3 | 123 | AHER MAHESH BABURAO | Open | MAR - OPEN -General -WT-3 | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय |
| 4 | 4 | 125 | BHOSLE SATISH RAMRAO | Open | MAR - OPEN -General -WT-4 | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय |
| 5 | 5 | 126 | BACHCHE AJINKYA SADASHIV | Open | MAR - OPEN -General -WT-5 | मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय |
| 6 | 6 | 128 | KADAM SANJIT NANASAHEB | Open | MAR - OPEN -General -WT-6 | नियंत्रक शिधावाटप कार्यालय |
| 7 | 7 | 130 | BIRADAR SANGMESHWAR ISHWARRAO | Open | MAR - OPEN -General -WT-7 | विधी व न्याय विभाग, मंत्रालय |
| 8 | 8 | 132 | MORE MAHESH SUBHASH | Open | MAR - OPEN -General -WT-8 | विधी व न्याय विभाग, मंत्रालय |
| 9 | 9 | 134 | Vaijinath Baliram Shirke | Open | MAR - OPEN -General -WT-9 | सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय |
| 10 | 10 | 135 | WALKE ROHIDAS JAYSING | Open | MAR - OPEN -General -WT-10 | वित्त विभाग, मंत्रालय |
| 11 | 11 | 136 | SHAIKH ASHPHAK MAHEBUB | Open | MAR - OPEN -General -WT-11 | वित्त विभाग, मंत्रालय |
| 12 | 12 | 137 | CHAVAN RAMESHWAR UTTAM | Open | MAR - OPEN -General -WT-12 | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय |
| 13 | 13 | 139 | SHAIKH SHAFI SHARFODIN | DT(A) | MAR - OPEN -General -WT-13 | नगर विकास विभाग, मंत्रालय |
| 14 | 14 | 142 | ramesh anurath ghorpade | Open | MAR - OPEN -General -WT-14 | वित्त विभाग, मंत्रालय |
| 15 | 15 | 143 | harish vilas dange | Open | MAR - OPEN -General -WT-15 | महसूल व वन विभाग, मंत्रालय |
| 16 | 16 | 145 | WASU SANTOSH DNYANBA | Open | MAR - OPEN -General -WT-16 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 17 | 17 | 146 | SAYYAD NABI KARIMSAB | Open | MAR - OPEN -General -WT-17 | गृह विभाग, मंत्रालय |
| 18 | 18 | 148 | PAWAL SUDARSHAN BABULAL | Open | MAR - OPEN -General -WT-18 | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय |
| 19 | 19 | 150 | PATHADE SOMNATH TATERAO | Open | MAR - OPEN -General -WT-19 | परिवहन आयुक्त |
| 20 | 20 | 152 | SHINDE RAHUL SUDAM | Open | MAR - OPEN -General -WT-20 | महसूल व वन विभाग, मंत्रालय |
| 21 | 21 | 156 | GOLHAR AMBADAS NAVNATH | NT(D) | MAR - OPEN -General -WT-21 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| 22 | 22 | 158 | Pangam Ramchandra Vasant | Open | MAR - OPEN -General -WT-22 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| 23 | 23 | 160 | KAPSE ROHIT SOMESHWAR | Open | MAR - OPEN -General -WT-23 | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय |

| अ. क्र. | शिफारस क्रमांक | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | ज्या प्रवर्गात शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप केलेला विभाग / कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| 24 | 24 | 161 | KALE CHANDRAKANT BHAGWANRAO | Open | MAR - OPEN -General -WT-24 | नियंत्रक शिधावाटप कार्यालय |
| 25 | 25 | 162 | PANDIT RUSHIKESH VIVEK | Open | MAR - OPEN -General -WT-25 | गृह विभाग, मंत्रालय |
| 26 | 26 | 163 | ALANDKAR DNYANDEO GANPATRAO | Open | MAR - OPEN -General -WT-26 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| 27 | 27 | 164 | jagtap sandipan shivajirao | Open | MAR - OPEN -General -WT-27 | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय |
| 28 | 28 | 166 | sankapal vishal tanaji | Open | MAR - OPEN -General -WT-28 | गृह विभाग, मंत्रालय |
| 29 | 29 | 172 | TAKMOGE BALASAHEB MOHAN | Open | MAR - OPEN -General -WT-29 | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय |
| 30 | 30 | 174 | KEDAR PRAMOD TRYAMBAK | NT(D) | MAR - OPEN -General -WT-30 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 31 | 31 | 175 | KHOKAD RAMSING GORAKHNATH | Open | MAR - OPEN -General -WT-31 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| 32 | 32 | 177 | VAKALE BHAGWAN RANGANATH | Open | MAR - OPEN -General -WT-32 | कामगार आयुक्त कार्यालय |
| 33 | 33 | 178 | KHADE SHARAD PRAKASH | NT(D) | MAR - OPEN -General -WT-33 | महसूल व वन विभाग, मंत्रालय |
| 34 | 34 | 184 | JAYBHAYE KAILAS DATTA | NT(D) | MAR - OPEN -General -WT-34 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 35 | 35 | 186 | BHARATE YOGESH DATTATRAY | Open | MAR - OPEN -General -WT-35 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 36 | 36 | 187 | PAWAR KIRAN LAXMAN | Open | MAR - OPEN -General -WT-36 | सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय |
| 37 | 37 | 205 | VAIDYA VILAS NIVRITTI | NT(C) | MAR - NT-C -General -WT-1 | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय |
| 38 | 38 | 206 | KAWANE SANDEEP NAMDEV | NT(C) | MAR - NT-C -General -WT-2 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई उपनगर |
| 39 | 39 | 302 | GANESH SUBHASH JADHAO | DT(A) | MAR - DT-A -General -WT-1 | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय |
| 40 | 40 | 441 | GAIKWAD ABHISHEK SHRIKRUSHNA | OBC | MAR - OBC -General -WT-1 | गृह विभाग, मंत्रालय |
| 41 | 41 | 445 | KUMBHAR VIKAS SANJAY | OBC | MAR - OBC -General -WT-2 | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय |
| 42 | 42 | 452 | TANMAY PRADIP JAIN | OBC | MAR - OBC -General -WT-3 | विधी व न्याय विभाग, मंत्रालय |
| 43 | 43 | 461 | DEVKAR AMOL VIJAY | OBC | MAR - OBC -General -WT-4 | महसूल व वन विभाग, मंत्रालय |
| 44 | 44 | 462 | DEOKAR MANGESH JAGDEO | OBC | MAR - OBC -General -WT-5 | गृह विभाग, मंत्रालय |

| अ. क्र. | शिफारस क्रमांक | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | ज्या प्रवर्गात शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप केलेला विभाग / कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| 45 | 45 | 464 | SHASHIKANT PANDIT KHAIRNAR | OBC | MAR - OBC -General -WT-6 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 46 | 46 | 466 | GOND VIVEKANAND KISHANRAO | OBC | MAR - OBC -General -WT-7 | वित्त विभाग, मंत्रालय |
| 47 | 47 | 476 | HALGE SUNIL NANDI | OBC | MAR - OBC -General -WT-8 | नियोजन विभाग, मंत्रालय |
| 48 | 48 | 477 | BHOIR NILESH PANDURANG | OBC | MAR - OBC -General -WT-9 | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय |
| 49 | 49 | 485 | CHOLE AKSHAY SUBHASH | OBC | MAR - OBC -General -WT-10 | गृहनिर्माण विभाग, मंत्रालय |
| 50 | 50 | 488 | JADHAO SANJAY BHARAT | OBC | MAR - OBC -General -WT-11 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 51 | 51 | 491 | RASKAR VINOD SHRIPATI | OBC | MAR - OBC -General -WT-12 | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय |
| 52 | 52 | 492 | SHIVANAND ASHOK GUDODAGI | OBC | MAR - OBC -General -WT-13 | वित्त विभाग, मंत्रालय |
| 53 | 53 | 498 | MALGE MADHAV MAROTI | OBC | MAR - OBC -General -WT-14 | उदयोग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय |
| 54 | 54 | 504 | CHANDEKAR RUPESH RAMESHWAR | OBC | MAR - OBC -General -WT-15 | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय |
| 55 | 55 | 510 | ROHIT KISAN MEHER | OBC | MAR - OBC -General -WT-16 | सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय |
| 56 | 56 | 513 | JAYALE GAJANAN SHRIKRUSHNA | OBC | MAR - OBC -General -WT-17 | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय |
| 57 | 57 | 518 | VARKUTE JAYRAM NAMDEV | OBC | MAR - OBC -General -WT-18 | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय |
| 58 | 58 | 526 | MASKAR SHEKHAR MADHUKAR | OBC | MAR - OBC -General -WT-19 | गृह विभाग, मंत्रालय |
| 59 | 59 | 527 | KOPARDE SHASHIKANT NARAYAN | OBC | MAR - OBC -General -WT-20 | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय |
| 60 | 60 | 529 | BHAKARE PRAFUL BHAORAO | OBC | MAR - OBC -General -WT-21 | संसदीय कार्य विभाग, मंत्रालय |
| 61 | 61 | 530 | WAGH RAKESH RAJARAM | OBC | MAR - OBC -General -WT-22 | महसूल व वन विभाग, मंत्रालय |
| 62 | 62 | 531 | SHELAR ASHVIN NANAJI | OBC | MAR - OBC -General -WT-23 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 63 | 63 | 534 | KOTHAWADE VIPUL RAMDAS | OBC | MAR - OBC -General -WT-24 | ग्राम विकास विभाग, मंत्रालय |
| 64 | 64 | 537 | Patil Bhavesh Satyawan | OBC | MAR - OBC -General -WT-25 | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय |
| 65 | 65 | 543 | MAINGADE AMOL TANAJI | OBC | MAR - OBC -General -WT-26 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 66 | 66 | 550 | BANSODE RAVIKUMAR HARI | OBC | MAR - OBC -General -WT-27 | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |
| 67 | 67 | 563 | SHRIKANT BHIMASHANKAR TELI | OBC | MAR - OBC -General -WT-28 | जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| 68 | 68 | 890 | Gadlinge Umesh Devidas | SC | MAR - SC -General -WT-1 | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय |

**७. सेवाप्रवेशोत्तर शर्ती** :-

**७.१** नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**७.१.१** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**७.१.२** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदरच परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**७.१.३** महाराष्ट्र नागरी सेवा (इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना प्राप्त करावयाच्या मराठी लघुलेखन/मराठी टंकलेखन परीक्षा सक्तीची करण्याबाबत) नियमावली, १९९१ नुसार विहित केलेल्या व्यावसायिक परीक्षा जर ती व्यक्ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्त्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**७.१.४** महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची परीक्षा

**८. परीक्षेचे टप्पे - एक**

**८.१** मुख्य परीक्षा - ४०० गुण

**८.२** मुख्य परीक्षेतील एकूण गुणांच्या आधारे गुणवत्तेनुसार अंतिम निवड करण्यात येईल.

**९. प्रमाणपत्र पडताळणी:-**

**९.१** आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे नियुक्तीपूर्वी सक्षम प्राधिका-याकडून तपासली जाईल.

**९.२** अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्रे सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

**९.३** अर्जातील दाव्यानुसार सक्षम प्राधिका-याकडून करण्यात आलेल्या प्रमाणपत्र पडताळणीच्या आधारे पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच नियुक्ती देण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांकडून करण्यात येईल.

**१०. शुल्क रुपये : १०.१ :-** अमागास - **५२४/-** **१०.२ :-** मागासवर्गीय - **३२४/-** **१०.३** माजी सैनिक - **२४/-**

**११. अर्ज करण्याची पध्दत :-**

**११.१** प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील.

**११.२** पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक २७ जुलै, २०१७ ते दिनांक १० ऑगस्ट, २०१७** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

**११.३** ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

**११.४** आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

**११.५** आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

**११.६** आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**११.७** परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

**११.७.१** शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंक वर क्लिक करावे.

**११.७.२** "माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर "माझे अॅप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

**११.७.३** 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. **'Unpaid'** लिहिलेल्या पद/परीक्षेसमोर **'Pay Now'** अशी लिंक उपलब्ध असेल.

**११.७.४** " **Pay Now**" या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील:- **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

**११.७.५** क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

**११.७.६** नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

**११.७.७** चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

**११.७.८** भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

**११.७.९** विहित पध्दतीने अर्ज सादर करुन ऑनलाईन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक १० ऑगस्ट, २०१७ रोजी २३.५९ वाजेपर्यंत** पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

**११.७.१०** चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक ११ ऑगस्ट, २०१७** पर्यंत **बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे** बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

**११.७.११** ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

**११.८ केंद्र निवड :-**

**११.८.१** परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला परीक्षा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे. त्याकरीता "माझे खाते" मधील संबंधित परीक्षेची निवड करावी. त्यानंतर "केंद्र निवडा" या पर्यायावर क्लिक करावे. सदर पर्यायांतर्गत निवडलेल्या केंद्राची क्षमता दर्शविली जाईल. केंद्राच्या

क्षमतेइतक्या अर्ज तत्पूर्वी प्राप्त झाले असतील, तर सदर केंद्र उपलब्ध नसून, दुसरे केंद्र निवडावे, असा संदेश प्राप्त होईल. केंद्राची निवड केल्यानंतर सेव्ह बटनावर क्लिक केल्यास केंद्र निवडीची व अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होईल.

**११.८.२** भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडलेले उमेदवार शुल्क भरल्याच्या दिनांकाच्या दुस-या दिवशी केंद्र निवडीची प्रक्रिया करु शकतील. दुसरा दिवस कार्यालयीन सुटटी अथवा रविवारचा असेल, तर सदर कार्यवाही त्यानंतर लगेच येणा-या पुढील कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी करता येईल.

**११.८.३** वरीलप्रमाणे केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यामधील नमूद जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

**११.८.४** केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत मान्य करण्यात येणार नाही.

**१२. पदांचा पसंतीक्रम :-**

**१२.१** प्रस्तुत परीक्षेसाठी ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करताना ज्या पदासाठी अर्ज केला आहे, ते पद (लिपिक-टंकलेखक मराठी अथवा लिपिक - टंकलेखक इंग्रजी ) नमूद करणे आवश्यक आहे. तसेच, दोन्ही पदांसाठी अर्ज करावयाचा असल्यास त्याप्रमाणे नमूद करणे आवश्यक आहे.

**१२.२** दोन्ही पदांसाठी अर्ज सादर करणा-या उमेदवारांनी पदांचा पसंतीक्रम दर्शविणे आवश्यक आहे. अशा प्रकारे पसंतीक्रम नमूद करण्याची फक्त एकच संधी खालील अटींवर देण्यात येईल:-

(१) पसंतीक्रम ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करतानाच अर्जामध्ये दर्शविणे आवश्यक राहील.

(२) पसंतीक्रम दर्शविलेल्या पदाकरीता टंकलेखनाचे विहित मर्यादेचे अर्हता प्रमाणपत्र नसल्यास, संबंधित पदांचा पसंतीक्रम रद्द करण्यात येईल.

(३) पसंतीक्रम आयोगास सादर केल्यानंतर पदाच्या पसंतीक्रमात बदल करण्यासंबंधीच्या विनंतीचा कोणत्याही परिस्थितीत विचार केला जाणार नाही.

**१३. प्रवेशप्रमाणपत्र** :-

**१३.१** प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे **७** दिवस अगोदर प्रवेशप्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१३.२** परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१४. परीक्षेस प्रवेश** :-

**१४.१** परीक्षेस येतेवेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही एक मूळ ओळखपत्र व त्याची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१४.२** फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व त्याची छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.

**१४.३** डिजीटल डायरी, पेजर, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने / साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

**१४.४** आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१५.** प्रस्तुत अधिसूचनेमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील स्पर्धा परीक्षेअंतर्गत '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**' तसेच "**परीक्षा योजना**" विभागातील **'लिपिक-टंकलेखक परीक्षा'** मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**१६.** प्रस्तुत परीक्षेचा सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या **www.mpsc.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१७.** सदर अधिसूचना आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई
दिनांक : २७ जुलै, २०१७

सुनिल अवताडे
उप सचिव
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. (२) प्रमाणपत्र तपासणीच्या वेळी पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे सादर न केल्यास शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.



# महाराष्ट्र लोकसेवा आयोग
## Maharashtra Public Service Commission




मुख्य कार्यालय : ५½ ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी-२२७९५९०० फॅक्सः२२८८०५२४
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा माळा, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी :२२६७०२१०/१४८/२४८,२२१०२२२२. फॅक्स : २२६७३९१५

ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in


## लिपिक - टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पूर्व परीक्षा - २०१७

**क्रमांक : एडीव्ही-३११७/सीआर-८४/२०१६/तीन** **जाहिरात क्रमांक : ०५/२०१७**

राज्य शासनाच्या **मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच बृहन्मुंबईतील विविध शासकीय कार्यालयातील लिपिक - टंकलेखक (मराठी/इंग्रजी), गट - क** संवर्गातील पदांच्या भरतीकरीता आयोगामार्फत **लिपिक - टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पूर्व परीक्षा - २०१७ रविवार, दिनांक ११ जून, २०१७** रोजी महाराष्ट्रातील **३७** जिल्हाकेंद्रांवर घेण्यात येईल. प्रस्तुत पूर्व परीक्षेच्या निकालाधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची मुख्य परीक्षा रविवार, दिनांक ३ सप्टेंबर, २०१७ रोजी किंवा त्यानंतर आयोजित होण्याची शक्यता आहे.

२. प्रस्तुत जाहिरातीत नमूद केलेल्या अटींची पुर्तता करणा-या उमेदवारांकडून ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागविण्यात येत आहेत.

**३. उपलब्ध पदसंख्या :-**

| **(१) लिपिक - टंकलेखक (मराठी)- एकूण ३७० पदे** | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रवर्ग | अ.जा. | अ.ज. | वि.जा.(अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | इ.मा.व. | वि. मा.प्र. | एकूण मागासवर्गीय | खुला | एकूण पदे |
| पदसंख्या | ३६+१२* | १८+३* | ५ | ९+६* | १०+४* | ५+२* | ६३+४८* | -- | २२१ | १४९ | ३७० |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | ३० | १२ | २ | ११ | १० | ४ | ७९ | -- | १४८ | ७६ | २२४ |
| (२) महिला | ११ | ५ | २ | ३ | ३ | २ | २० | -- | ४६ | ४५ | ९१ |
| (३) माजी सैनिक | ५ | ३ | १ | १ | १ | १ | ९ | -- | २१ | २१ | ४२ |
| (४) खेळाडू | २ | १ | -- | -- | -- | -- | ३ | -- | ६ | ७ | १३ |
| (५) विकलांग | एकूण पदे- ३ (१ )श्रवण शक्तीतील दोष - २ (२) चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू - १ | | | | | | | | | | |
| **(२) लिपिक - टंकलेखक (इंग्रजी) - एकूण ३८ पदे** | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | ३+२* | १+१* | १ | १+१* | १ | १ | ६+६* | -- | २४ | १४ | ३८ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :- | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | ४ | २ | १ | २ | १ | १ | ९ | -- | २० | ७ | २७ |
| (२) महिला | १ | -- | -- | -- | -- | -- | २ | -- | ३ | ४ | ७ |
| (३) माजी सैनिक | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | -- | १ | २ | ३ |
| (४) खेळाडू | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | १ |
| (५) विकलांग | एकूण पदे- १ - श्रवण शक्तीतील दोष - १ | | | | | | | | | | |
| *अनुशेषाची पदे | | | | | | | | | | | |

**३.१** वर नमूद पदसंख्या व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे. पदसंख्या व आरक्षणामध्ये बदल झाल्यास त्याचा समावेश मुख्य परीक्षेच्या अधिसूचनेमध्ये करण्यात येईल.

**३.२** उपरोक्त पदे सध्या फक्त मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील आहेत. **मात्र याव्यतिरिक्त राज्य शासनाच्या बृहन्मुंबईतील विविध शासकीय कार्यालयातील पदांचाही यात समावेश होण्याची शक्यता आहे.** अशा पदांचा तपशील मुख्य परीक्षेच्या अधिसूचनेमध्ये उपलब्ध करुन देण्यात येईल.

**३.३** महिला, खेळाडू व माजी सैनिकांसाठीचे आरक्षण हे शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**३.४** महिलांसाठी आरक्षित पदांकरिता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अ.जा. व अ.ज. वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

**३.५** वि.जा (अ), भ.ज. (ब), भ.ज. (क) व भ.ज. (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित वर्गवारीतील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गातील उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**३.६** शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६ तसेच शासन शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासंदर्भात तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**३.७** प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवारांच्या बाबतीत त्यांची क्रीडा विषयक प्रमाणपत्रे योग्य असल्याबाबत व खेळाडू या पदासाठी पात्र ठरतो याबाबत, आयोगास अर्ज सादर करण्यापूर्वीच, सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्रमाणपत्र प्राप्त केलेले असणे आवश्यक आहे.

**३.८** संचालक, क्रीडा व युवा संचालनालय किंवा सक्षम प्राधिका-याकडे प्रमाणपत्रे सादर करताना पात्र खेळाडू उमेदवाराने प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासाठी त्यांना पात्र ठरविणारी आपली खेळाडू विषयक **सर्व प्रमाणपत्रे एकाच वेळी** सादर करणे आवश्यक आहे.

**३.९** क्रीडा प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत व खेळाडू कोणत्या संवर्गासाठी पात्र ठरतो याविषयी अर्ज सादर करण्यापूर्वीच्या दिनांकाचे सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्रमाणपत्र सादर केले तरच त्यांना खेळाडू प्रवर्गाच्या आरक्षणाचा लाभ घेता येईल.

**३.१०** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक कअस १३१५/प्र.क्र.१२०/१४ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ नुसार अंधत्व किंवा क्षीणदृष्टी, श्रवणशक्तीतील दोष व चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू या प्रकारच्या पात्रतेचे निकष धारण करणारे विकलांग उमेदवार गुणवत्तेनुसार शिफारशीसाठी पात्र असतील.

३.११ विकलांग उमेदवारांची पात्रता शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

३.१२ विकलांगांसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

३.१३ विकलांगासाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता विकलांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

३.१४ विकलांग व्यक्तींसाठी असलेल्या वयोमर्यादेचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्रकि-२०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१२ मधील आदेशानुसार SADM या नविन संगणक प्रणालीदवारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील विकलांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.

३.१५ समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३.१६ मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट पिटीशन क्रमांक २०५३/२०१४ प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून प्रस्तुत प्रकरणी पदभरतीची कार्यवाही करण्यात येत आहे.

३.१७ परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर मागासवर्गीयासाठी विहित केलेली वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास, अशा उमेदवारांची अमागास (सर्वसाधारण) पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

३.१८ विकलांग उमेदवारांना गुणवत्तेनुसार लेखनिकाची मदत घेता येईल. तथापि, अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत यासंदर्भात संबंधित उमेदवाराने आयोगास स्वतंत्रपणे पत्राद्वारे विनंती करणे आवश्यक आहे.

३.१९ अमागास उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक निकषांसदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा अमागास सर्वसाधारण पदावरील शिफारशींकरीता विचार होत असल्याने सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी अर्जामध्ये त्यांच्या आरक्षित प्रवर्गासंदर्भातील माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

४. **वेतनश्रेणी** :-

४.१ रुपये ५२००-२०२००(ग्रेड पे-रुपये १९००/-) अधिक नियमानुसार भत्ते.

५. **पात्रता** :-

५.१. भारतीय नागरिकत्व

५.२ वयोमर्यादा :-

**५.२.१** **दिनांक १ ऑगस्ट, २०१७** रोजी वय किमान १८ वर्षे असावे व कमाल ३८ वर्षापेक्षा जास्त नसावे.

**५.२.२** उच्च वयोमर्यादा खालील बाबतीत शिथिलक्षम :-

(१) महाराष्ट्र शासनाने मान्यता दिलेल्या मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षापर्यंत शिथिलक्षम.

(२) प्राविण्य प्राप्त खेळाडूंच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षांपर्यंत शिथिलक्षम.

(३) माजी सैनिक उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मासैक-१०१०/प्र.क्र.२७९/१०/१६-अ, दिनांक २० ऑगस्ट, २०१० आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

(४) विकलांग उमेदवारांच्या बाबतीत वयाच्या ४५ वर्षांपर्यंत.

(५) विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**५.३ अर्हता** :-

**५.३.१** महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (एस.एस.सी.) किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी. च्या समतुल्य म्हणून घोषित केलेली अर्हता.

**५.३.२** लिपिक-टंकलेखक(मराठी) पदासाठी मराठी टंकलेखनाचा वेग ३० शब्द प्रति मिनिट व लिपिक-टंकलेखक(इंग्रजी) पदासाठी इंग्रजी टंकलेखनाचा वेग ४० शब्द प्रति मिनिट या अर्हतेचे शासकीय वाणिज्य परीक्षा मंडळाचे प्रमाणपत्र.

**५.३.३** शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसपीई १०१२/(१०८/१२)/साशि-१, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३ नुसार अथवा तदनंतर शासनाने वेळोवेळी आदेश काढून विहित केलेली संगणक टंकलेखन अर्हता- बेसिक कोर्स इन कॉम्प्युटर टायपिंग मराठी ३० शब्द प्रति मिनिट अथवा बेसिक कोर्स इन कॉम्प्युटर टायपिंग इंग्रजी ४०शब्द प्रति मिनिट(लागू असेल त्याप्रमाणे) समकक्ष अर्हता म्हणून स्वीकारार्ह आहे.

**५.३.४** शासकीय वाणिज्य परीक्षा मंडळाची उपरोक्त टंकलेखन अर्हता मुख्य परीक्षेकरीता अर्ज/माहिती सादर करण्याच्या अंतिम दिनांकास प्राप्त करणे आवश्यक आहे.

**५.३.५** माजी सैनिक उमेदवाराने विहित टंकलेखन अर्हतेचे प्रमाणपत्र धारण केलेले नसेल तर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एएससी-१५१२/प्र.क्र.१४८/१४-अ, दिनांक २४ मार्च, २०१७ नुसार शासकीय वाणिज्य संस्थेचे विहित टंकलेखन अर्हतेचे प्रमाणपत्र त्याच्या नियुक्तीच्या दिनांकापासून ११ महिन्यात सादर करणे आवश्यक राहील.

**५.३.६** मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.

६. **सेवाप्रवेशोत्तर शर्ती** :-

**६.१** नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**६.१.१** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**६.१.२** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदरच परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**६.१.३** महाराष्ट्र नागरी सेवा (इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना प्राप्त करावयाच्या मराठी लघुलेखन/मराठी टंकलेखन परीक्षा सक्तीची करण्याबाबत) नियमावली, १९९१ नुसार विहित केलेल्या व्यावसायिक परीक्षा जर ती व्यक्ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्त्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**६.१.४** महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची परीक्षा

**७.प्रमाणपत्र पडताळणी:-**

७.१ आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे नियुक्तीपूर्वी सक्षम प्राधिका-याकडून तपासली जाईल.

७.२ अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्रे सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

७.३ अर्जातील दाव्यानुसार सक्षम प्राधिका-याकडून करण्यात आलेल्या प्रमाणपत्र पडताळणीच्या आधारे पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच नियुक्ती देण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांकडून करण्यात येईल.

**८. परीक्षेचे टप्पे - दोन**

८.१ प्रस्तुत परीक्षा खालील दोन टप्प्यामध्ये घेण्यात येईल :-

(१) पूर्व परीक्षा - १०० गुण

(२) मुख्य परीक्षा - ४०० गुण

**९. पूर्व परीक्षेकरीता शुल्क रुपये : ९.१ :-** अमागास - **३७३/-** **९.२ :-** मागासवर्गीय - **२७३/-** **९.३:-** माजी सैनिक **-२३/**

**१०. अर्ज करण्याची पध्दत :-**

१०.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील.

१०.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक ६ एप्रिल, २०१७ ते दिनांक २६ एप्रिल, २०१७** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

१०.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

१०.४ आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

१०.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

१०.६ आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतली जाणार नाही.

१०.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

१०.७.१ शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील माझे खाते या लिंक वर क्लिक करावे.

१०.७.२ "माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर "माझे अॅप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

१०.७.३ 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. **'Unpaid'** लि**हि**लेल्या पद/परीक्षेसमोर **'Pay Now'** अशी लिंक उपलब्ध असेल.

१०.७.४ **" Pay Now"** या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील. **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

१०.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

१०.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

१०.७.७ चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

१०.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

१०.७.९ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन ऑनलाईन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक २६ एप्रिल, २०१७ रोजी २३.५९** वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

१०.७.१० चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक २७ एप्रिल, २०१७** पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

१०.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

**१०.८ केंद्र निवड :-**

१०.८.१ परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला परीक्षा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे. त्याकरीता "माझे खाते" मधील संबंधित परीक्षेची निवड करावी. त्यानंतर "केंद्र निवडा" या पर्यायावर क्लिक करावे. सदर पर्यायांतर्गत निवडलेल्या केंद्राची क्षमता दर्शविली जाईल. केंद्राच्या क्षमतेइतक्या अर्ज तत्पूर्वी प्राप्त झाले असतील, तर सदर केंद्र उपलब्ध नसून, दुसरे केंद्र निवडावे, असा संदेश प्राप्त होईल. केंद्राची निवड केल्यानंतर सेव्ह बटनावर क्लिक केल्यास केंद्र निवडीची व अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होईल.

१०.८.२ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडलेले उमेदवार शुल्क भरल्याच्या दिनांकाच्या दुस-या दिवशी केंद्र निवडीची प्रक्रिया करु शकतील. दुसरा दिवस कार्यालयीन सुटटी अथवा रविवारचा असेल, तर सदर कार्यवाही त्यानंतर लगेच येणा-या पुढील कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी करता येईल.

१०.८.३ वरीलप्रमाणे केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यामधील नमूद जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

१०.८.४ केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत मान्य करण्यात येणार नाही.

**११. प्रवेशप्रमाणपत्र :-**

११.१ प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे ७ दिवस अगोदर प्रवेशप्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

११.२ परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**११.३** परीक्षेस येतेवेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही एक मूळ ओळखपत्र व त्याची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१२.परीक्षेस प्रवेश**

**१२.१** फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व त्याची छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.

**१२.२** डिजीटल डायरी, पेजर, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने / साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

**१२.३** आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१३.** प्रस्तुत जाहिरातीमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील स्पर्धा परीक्षेअंतर्गत '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**' तसेच "**परीक्षा**" विभागातील '**लिपिक - टंकलेखक परीक्षा**' मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**१४.** प्रस्तुत परीक्षेचा सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या **www.mpsc.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१५.** सदर जाहिरात आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई.
दिनांक : ६ एप्रिल, २०१७

सु. ह. अवताडे
अवर सचिव
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. (२) प्रमाणपत्र तपासण्याच्यावेळी सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्र सादर न केल्यास सदर परीक्षेची उमेदवारी नाकारली जाईल.

## सरळसेवा लिपिक-टंकलेखक परीक्षा-२०१७ प्रतिक्षायादीतून मंत्रालयीन विभागात

## नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

क्रमांक : (विभागाचे नांव व पत्ता)
दिनांक :

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांची
लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियुक्ती
सरळसेवा लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) परीक्षा २०१७
संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे क्र.एएससी १५१८/प्र.क्र.९३/१४-अ,
दिनांक ०८.०२.२०१९ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | गुणवत्ता क्रमांक |
|---|---|---|

(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | गुणवत्ता क्रमांक |
|---|---|---|

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यांच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे

**सरळसेवा लिपिक-टंकलेखक परीक्षा-२०१७ प्रतिक्षायादीतून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन**

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

क्रमांक : (कार्यालयाचे नांव व पत्ता)
दिनांक :

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांची लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावर नियुक्ती सरळसेवा लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) परीक्षा २०१७

संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे क्र.एएससी १५१८/प्र.क्र.९३/१४-अ, दिनांक ०८.०२.२०१९ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | गुणवत्ता क्रमांक |
|---|---|---|

(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | गुणवत्ता क्रमांक |
|---|---|---|

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते लिपिक-टंकलेखक (मराठी/इंग्रजी) पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यांच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे